पंधराव्या वित्त आयोगाअंतर्गत पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वापराबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्र. जजीमि/०६०२०/प्र.क्र.२०/पापु-०७**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग,
नवीन मंत्रालय, मुंबई.
दिनांक: ०३ ऑगस्ट २०२०.

**वाचा**

१. ग्राम विकास विभागाचे पत्र क्र. : जीपीडीपी २०२०/प्र.क्र. ३१/पंरा-६, दिनांक १९ मे, २०२०
२. शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्र. पंविआ/२०२०/प्र.क्र.५९/वित्त-४, दि. २६ जून, २०२०
३. शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्र. पंविआ/२०२०/प्र.क्र.५८/वित्त-४, दि. २९ जून, २०२०
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. W-११०३७/३/२०१९- Water-१, २२ July, २०१९
५. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : जजीमि/०६२०/ प्रक्र.२०/पापु-०७, दि.३०.६.२०२०

**प्रस्तावना-**

केंद्र शासनाने पंधराव्या वित्त आयोगांतर्गत ग्रामपंचायतींना देण्यात येणारा निधी ५०% बंधीत स्वरुपात ठेवला असून त्याचा वापर मुख्यत: पिण्याच्या पाण्याच्या व स्वच्छतेच्या योजनांसाठी करण्यात यावा अशा सूचना दिलेल्या आहेत. १५ व्या वित्त आयोगा अंतर्गत ग्रामपंचायतींना वितरीत होणारा निधी हा ग्रामविकास विभागातर्फे वितरीत करण्यात येतो. ग्राम विकास विभागाने १५ व्या वित्त आयोगाचा निधी वितरीत करण्याबाबतचा शासन निर्णय दि. २९ जून, २०२० निर्गमित केला आहे.

या निधीतील बंधीत निधी वितरीत करताना जल जीवन मिशन अंतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा योजना कार्यक्रमांसाठी वापरण्यात यावा या संदर्भात पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत सुस्पष्ट मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

पंधराव्या वित्त आयोगांतर्गत ग्रामपंचायतींना देण्यात येणाऱ्या निधीमधील, बंधीत स्वरुपातील निधी हा सद्यस्थितीत पाणी पुरवठ्याच्या कामांसाठी प्राधान्याने वापरणे गरजेचे आहे. यास अनुसरून पंधराव्या वित्त आयोगांतर्गत ग्रामपंचायतींना देण्यात येणाऱ्या निधीमधील, बंधीत स्वरुपातील निधी पुढील आदेश होईपर्यंत फक्त संबंधीत ग्रामपंचायतीने १००% कार्यात्मक घरगुती नळजोडणी (FHTC) देण्यासाठी वापरण्यात यावा, असे करताना खालील सुचनांचे पालन करण्यात यावे.

अ) जी गावे जल जीवन मिशन अंतर्गत, संदर्भ क्र.५ दि.३०.६.२०२० शासन निर्णयामध्ये नमुद सुधारणात्मक पुनर्जोडणीसाठी कार्यकारी अभियंता यांच्या स्तरावर निवडण्यात आली आहेत, त्यांची कार्यात्मक घरगुती नळ जोडणीची कामे (FHTC) ग्रामपंचायत पातळीवर पुर्ण करावी. ग्राम विकास विभागाने दिलेले वित्त आयोगाचा निधी वापरासंबंधीचे प्रशासकीय अधिकार ग्रामपंचायतीस आहेत त्या मर्यादेत प्रशासकीय मान्यता ग्रामपंचायतीस देता येईल. अशा कामांना तांत्रिक मान्यता देण्यास उप अभियंता, पाणी पुरवठा व स्वच्छता उपविभाग, जिल्हा परिषद हे सक्षम राहतील.

ब) ज्या गावांमध्ये संदर्भ क्र.५ मधील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या कामांपेक्षा अधिक कामे (ऊदा. स्त्रोत विकास, नवीन स्त्रोतांचा शोध, ऊर्ध्व /गुरुत्व वाहीन्या,पाण्याची टाकी बांधणे ई..) करुन कार्यात्मक घरगुती नळ जोडणीची कामे (FHTC) करावयाची आहेत, अशा गावांनी १५ वित्त आयोगातून प्रथम १००% घरांना नळजोडणीची कामे पूर्ण करावीत. ग्राम विकास विभागाने दिलेले वित्त आयोगाचा निधी वापरासंबंधीचे प्रशासकीय अधिकार ग्रामपंचायतीस आहेत, त्या मर्यादेत ग्रामपंचायतीने प्रशासकीय मान्यता द्यावी. अशा कामाना तांत्रिक मान्यता देण्यास उप अभियंता, पाणी पुरवठा उपविभाग, जिल्हा परिषद हे सक्षम राहतील.

क) वरील ब मधील ग्राम पंचायतींनी कार्यात्मकता साध्य करण्यासाठी नळजोडणी व्यतिरिक्त इतर आवश्यक कामाचे ( ऊदा. स्त्रोत विकास, नवीन स्त्रोतांचा शोध, ऊर्ध्व / गुरुत्व वाहीन्या,पाण्याची टाकी बांधणे ई. ) स्वतंत्र अंदाजपत्रक तयार करावे. अशा कामांना रु. १५.०० लक्ष किंमतीपर्यंत प्रशासकीय मान्यता ही ग्रामपंचायत देईल. मात्र या सर्व प्रस्तावांना तंत्रिक मान्यता देण्यास कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद हे सक्षम अधिकारी असतील.

ड) वरील अ ब क प्रमाणे कामे करतांना, वित्त आयोगाच्या निधी कमी पडल्यास त्या प्रमाणात जलजीवन मिशनचा निधी जिल्हा स्तरावरून ग्रामपंचायतींच्या खात्यात तात्काळ मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद जमा करतील.

ई ) वरील सर्व कामे (अ ब क ) ग्रामपंचायतीस्तरावर ग्राम विकास विभागाने वित्त आयोगाच्या निधीसाठी घालून दिलेल्या प्रक्रियांचे पालन करून, करण्यात यावे.

फ) तांत्रिक मान्यता देणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याने प्रत्येक अंदाजपत्रकांना मान्यता देतांना, खालीलप्रमाणे प्रमाणित करणे आवश्यक राहील.

**“या तांत्रिक मान्यतेनुसार एकूण --- (येथे संख्या नमूद करावी) इतक्या घरांना जल जीवन मिशनच्या निकषानुसार कार्यात्मक नळ जोडणी (FHTC) मिळतील. त्याचे निकषानुसार मुल्यमापन करुन घेण्यात येईल.**

ग) वित्त आयोगाच्या निधीअंतर्गत मंजुर करण्यात आलेल्या अंदाजपत्रकातील समाविष्ट कामांचा, जल जीवन मिशन अंतर्गत तयार करण्यात येणाऱ्या अंदाजपत्रकात समावेश करण्यात येऊ नये.

ह) वित्त आयोगांतर्गत करण्यात येणाऱ्या कामांसाठी जिल्हा परिषद तांत्रिक मंजूरीसाठी कोणतीही प्रशासकीय फी आकारणार नाही. जल जीवन मिशन अंतर्गत तयार करण्यात येणाऱ्या अंदाजपत्रकाबाबत प्रचलित पध्दतीनुसार कार्यवाही करावी.

ए) वित्त आयोगांतर्गत ग्रामपंचायतीने उपरोक्त नमूद केलेल्या कामाचा अहवाल जिल्हा परिषदेस देणे अनिवार्य राहील.

ज) रु. १५.०० लक्ष किंमतीपेक्षा जास्त किंमतीच्या सुधारणात्मक पुनर्जोडणीची कामे प्रचलित पद्धतीने करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००८०३१११३३४७१३२८ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.08.03 16:15:44 +05'30'

**( वसंत माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधिमंडळ, मंत्रालय, मुंबई
७. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, महाराष्ट्र विधिमंडळ, मंत्रालय, मुंबई
८. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
९. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
१०. मा.अपर मुख्य सचिव ( पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई
११. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, मुंबई-२१
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
१३. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
१४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१६. सह सचिव / उपसचिव / विशेष कार्य अधिकारी सर्व, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई
१७. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई
१८. मुख्य अभियंता (सर्व),/ अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
१९. कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण / ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
२०. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद, (सर्व)
२१. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील अवर सचिव / कार्यासन अधिकारी (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग)
२२. निवडनस्ती (कार्यासन पापु - ०७)
२३. WSSO.